**महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम, १९४९ चे कलम ४५१ (१) अन्वये सांगली मिरज कुपवाड शहर महानगरपालिका स्थायी समिती सभा ठराव क्रं.२१ दि.२६.११.२०१३ निलंबीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक न्यायाप्र-२०१८/प्र.क्र. ११/नवि-१९**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १४ जून, २०१८

**वाचा** :-

आयुक्त, सांगली मिरज कुपवाड शहर महानगरपालिका यांचे पत्र क्र. मनपा/आस्थावि/१/१०३/२०१५-१६, दिनांक ३०/०४/२०१५ व क्र.मनपा/आस्थावि/८०/२०१८-१९ दिनांक २१/०४/२०१८.

**प्रस्तावना :**

श्री.प्रकाश साहेबराव गायकवाड हे सांगली -मिरज-कुपवाड शहर महानगरपालिका कार्यालयात मालमत्ता विभागामध्ये वरीष्ठ लिपिक पदावर कार्यरत होते. सदर पदावर कार्यरत असतांना दैनिक बाजार फी वसुली, गाळा भाडे वसुली इत्यादी कामात दुर्लक्ष व निष्काळजीपणा केल्यामुळे महानगरपालिकेचे आर्थिक नुकसान झाल्यामुळे त्यांना दि.१४.०५.२००९ रोजी महानगरपालिकेच्या सेवेतून निलंबित करण्यात आले. परंतु, तद्नंतर त्यांना विभागीय चौकशी निकालाच्या अधिन राहून दि.०६/०३/२०१० रोजीच्या आदेशान्वये सेवेत पुर्नस्थापीत केले.

२. निलंबन प्रकरणी श्री.प्रकाश साहेबराव गायकवाड,वरीष्ठ लिपिक यांच्या विरुध्द विभागीय चौकशी सुरू करून त्यांच्यावर दोषारोप बजावण्यात आले. त्यांच्यावर ठेवण्यात आलेल्या ५ दोषारोपांपैकी ४ दोषारोप हे विभागीय चौकशीअंती सिध्द झाल्यामुळे श्री.प्रकाश साहेबराव गायकवाड यांना महानगरपालिकेच्या आर्थिक नुकसानीस जबाबदार धरून महाराष्ट्र नागरी सेवा नियम (शिस्त व अपील) १९७९ मधील तरतूदीनुसार वरीष्ठ लिपिक पदाच्या मुळ वेतन श्रेणीवर आणण्याची शास्ती देण्यात आली.

३ . श्री.प्रकाश साहेबराव गायकवाड यांनी त्यांना दिलेल्या शास्तीच्या विरोधात मा. औद्योगीक न्यायालय सांगली येथे ULP क्र.२३/२०११ ने तक्रार दाखल केली. तदनंतर श्री.गायकवाड हे नियत वयोमानानूसार दि.३१.०५.२०११ रोजी महानगरपालिकेच्या सेवेतून सेवानिवृत्त झाले. मा. औद्योगीक न्यायालय सांगली येथे दाखल ULP क्र.२३/२०११ न्यायालयाने दि.२५.१०.२०१२ रोजीच्या निर्णयान्वये नामंजूर केली. त्यानुसार दि.३०.०८.२०१३ रोजी श्री .गायकवाड यांना मुळ वेतनश्रेणीवर आणण्याची शास्ती देण्यात आली व त्यानुसार परिगणना करून त्यांना उपदानाची रक्कम अदा केली व निवृत्तीवेतन सुरू करण्यात आले.

४. श्री.प्रकाश साहेबराव गायकवाड यांनी त्यांना दिलेल्या शास्तीचे विरोधात सेवानिवृत्तीनंतर स्थायी समितीकडे अपील दाखल केले. त्यावर स्थायी समितीने ठराव क्र.२१, दि.२६.११.२०१३ खालीलप्रमाणे मंजूर केला :-

"श्री. गायकवाड यांना मूळ वेतनश्रेणीवर पदावन्नत करणेचा घेतलेला निर्णय चूकीचा व अन्यायकारक असल्याने तो निर्णय ही सभा रद्द करीत असून, श्री.गायकवाड यांनी स्थायी समितीकडे केलेले अपील मान्य करीत आहे. आयुक्त यांनी दिलेली शास्ती रद्द केल्यामुळे श्री.गायकवाड यांना त्यांचे मूळ पदावर

निलबंन करण्याचे अगोदर असलेल्या वेतनाच्या टप्प्यावर पदस्थापीत करण्यास ही सभा मान्यता देत आहे. त्यामुळे श्री.गायकवाड यांना निवृत्ती वेतन , उपदान विषयक सर्व देय असलेले सर्व फायदे फरकासह अदा करण्यास या सभेची मान्यता आहे. तसेच श्री.गायकवाड यांना निलंबन कालावधी हा पुर्णपणे कामावर व्यथीत केलेला कालावधी समजून त्यांना त्या अनुषंगाने देय होणारे सर्व आर्थिक फायदे देण्यास ही सभा मंजूरी देत आहे."

५. स्थायी समितीने संमत केलेला उपरोक्त ठराव क्र. २१, दि.२६.११.२०१३ हा प्रशासकीय व आर्थिक शिस्तीच्या दृष्टीने हितावह नसल्याची बाब नमूद करून सदर ठरावाच्या विखंडनाचा प्रस्ताव दि.३०.०४.२०१५ रोजीच्या पत्रान्वये आयुक्त, सांगली-मिरज-कुपवाड शहर महानगरपालिका यांनी शासनास सादर केला.

६. श्री.गायकवाड, यांनी दरम्यानच्या कालावधीमध्ये मा. औद्योगिक न्यायालय , सांगली येथे ULP No.१३७/२०१४ ने तक्रार दाखल केली. मा.औद्योगिक न्यायालयाने " स्थायी समिती सभा ठराव क्र.२१, दि. २६.११.२०१३ विखंडीत करण्याबाबत कोणतीही कार्यवाही केलेली नसल्याची " बाब नमूद करून दि.१३.०७.२०१६ रोजी श्री.गायकवाड यांच्या बाजूने आदेश पारित केले. मा.औद्योगिक न्यायालयाच्या सदर आदेशाविरूध्द सांगली-मिरज-कुपवाड महानगरपालिकेने मा.उच्च न्यायालयात रिट याचिका दाखल केली असून, सदर याचिकेवर मा. उच्च न्यायालयाने "महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम, १९४९ मधील तरतूदीनुसार दि.३०.०४.२०१५ रोजीच्या पत्रान्वये आयुक्त, सांगली मिरज कुपवाड शहर महानगरपालिका यांनी शासनास सादर केलेल्या "स्थायी समिती सभा ठराव क्र.२१ दि.२६.११.२०१३" विखंडीत करण्याबाबतच्या प्रस्तावावर शासनाने आठ (८) आठवडयाच्या आत निर्णय घ्यावा." असे आदेश दि.१८/०४/२०१८ रोजी दिलेले आहेत.

७. श्री.प्रकाश साहेबराव गायकवाड, यांना मुळ वेतन श्रेणीवर आणण्याची शास्ती ही ते महानगरपालिकेत कार्यरत असतांना दैनिक बाजार फी वसुली, गाळा भाडे वसुली, इत्यादी कामात दुर्लक्ष व निष्काळजीपणा केल्यामुळे त्यांच्या विभागीय चौकशी अंती त्यांच्यावर ठेवण्यात आलेल्या ५ दोषारोपांपैकी ४ दोषारोप हे सिध्द झाल्यामुळे, महानगरपालिकेच्या आर्थिक नुकसानीस जबाबदार धरून महाराष्ट्र नागरी सेवा नियम (शिस्त व अपील) १९७९ मधील तरतूदीनुसार देण्यात आली आहे. तथापि, स्थायी समितीने श्री.प्रकाश साहेबराव गायकवाड यांना वरीष्ठ लिपिक पदाच्या मुळ वेतन श्रेणीवर आणण्याची शास्ती देण्याचा आदेश रद्द करण्याबाबतचे त्यांचे अपिल सर्वानुमते मंजूर करण्याबाबतचा ठराव क्र.२१ दि.२६/११/२०१३ समंत केलेला आहे. सदर ठराव हा नियमबाहय असून महानगरपालिकेस आर्थिक नुकसानीचा आहे. त्यामुळे महानगरपालिकेच्या स्थायाी समितीने समंत केलेला ठराव क्र.२१ दि.२६/११/२०१३ विखंडीत करण्याची विनंती आयुक्त, सांगली -मिरज-कुपवाड शहर महानगरपालिका यांनी दि.३०/०४/२०१५ रोजीच्या पत्रान्वये केलेली आहे.

८. उपरोक्त नमूद बाबीं विचारात घेऊन महानगरपालिकेच्या स्थायी समितीने समंत केलेला ठराव क्र.२१ दि.२६/११/२०१३ हा महानगरपालिकेच्या आर्थिक हिताच्या विरोधात असल्याने निलंबित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सांगली मिरज कुपवाड शहर महानगरपालिकेच्या स्थायी समितीचा ठराव क्र.२१ दि.२६/११/२०१३ महानगरपालिकेच्या आर्थिक हिताच्या तसेच व्यापक लोकहिताच्या विरोधात असल्याने महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम, १९४९ मधील कलम ४५१ (१) मधील तरतुदीनुसार प्रथमत: निलंबित करण्यात येत आहे.

२. महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमाचे कलम ४५१ (२) नुसार सदर शासन निर्णयाच्या दिनांकापासून एक महिन्याचे आत संबंधितांना याबाबत राज्य शासनाकडे अभिवेदन करता येईल. विहीत मुदतीत अभिवेदन प्राप्त न झाल्यास या अधिनियमातील कलम ४५१ (३) नुसार पुढील योग्य ती कार्यवाही करण्यात येईल.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८०६१५१२०८४३८९२५ असा आहे. सदर शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Kailas Madhukar Badhan

Digitally signed by Kailas Madhukar Badhan
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=22804d8f98c03e9a67ca8eca6a02e7eaab4bcc4a3d59dfce4f1c7189ab74b085, serialNumber=e83c1c73de120837488d76379734db4868992e2b35ba1df8cfea9650fcff780f, cn=Kailas Madhukar Badhan
Date: 2018.06.15 12:10:18 +05'30'

( कैलास बधान )
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा.राज्यमंत्री (नगरविकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) आयुक्त, सांगली मिरज कुपवाड शहर महानगरपालिका, सांगली.
३) नगर सचिव तथा प्राधिकृत अधिकारी, सांगली मिरज कुपवाड शहर महानगरपालिका, सांगली
४) प्रधान सचिव (नवि-२) यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई.
५) निवड नस्ती ( नवि-१९)